**शासनाने दिनांक १ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटीपेक्षा कमी उलाढाल असलेल्या व्यापा-यांना स्थानिक संस्था करामधून सुट दिल्याने महानगरपालिकांच्या स्थानिक संस्था करापासूनच्या उत्पन्नामध्ये येणारी घट भरून काढण्यासाठी शासनाकडून देण्यात येणारे सहाय्यक अनुदान**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१५/(प्र.क्र.१३५/२०१५)/नवि-३२**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: ०४ ऑगस्ट, २०१५

**वाचा :-**

१. शासन अधिसुचना स्थासंक ४७/२०१५.क्र.प्र/२०१५-नवि ३२-दि०१.०८.२०१५.
२. शासन परिपत्रक नगरविकास विभाग क्र .बीयुडी/१४१५ प्र.क्र/१४३.नवि ४-दिनांक.२०१५.०८.०४

**प्रस्तावना :-**

शासनाने दिनांक ०१ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटी पेक्षा कमी आर्थिक उलाढाल असलेल्या सर्व व्यापा-यांना स्थानिक संस्था करामधून सूट देण्याचा निर्णय घेतला आहे. यामुळे महानगरपालिकांच्या उत्पन्नामध्ये येणारी तुट भरूण काढण्यासाठी महानगरपालिकांना यापुढे १% मुद्रांक शुल्क अधिभारापासून प्राप्त होणारे उत्पन्न त्याचबरोबर ५० कोटीपेक्षा जास्त उलाढाल असलेल्या व्यापा-यांकडून महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करापासूनचे उत्पन्न हा पर्यायी स्त्रोत उपलब्ध असणार आहे. तसेच या पर्यायी स्त्रोतापासून प्राप्त होणारे उत्पन्न व सन २०१५-१६ मध्ये महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करापासूनचे संभाव्य उत्पन्न यामध्ये येणारी तुट शासनाकडून अनुदानाच्या स्वरूपात महानगरपालिकांना देण्यात येणार आहे.

सन २०१५-१६ मध्ये वित्त विभागाने ऑगस्ट २०१५ ते डिसेंबर २०१५ या ५ महिन्याच्या कालावधीसाठी रू.२०९८.४० कोटीची पूरक मागणी मान्य केली आहे. दिनांक १ ऑगस्ट २०१५ पासून शासनाच्या स्थानिक संस्था कराच्या नवीन धोरणाची अंमलबजावणी सुरू झाली असल्याने महानगरपालिकांना त्यांचा दैनंदिन खर्च भागविण्यासाठी ऑगस्ट २०१५ साठी खालील प्रमाणे अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

२५ महानगरपालिकांना माहे-ऑगस्ट २०१५ या महिन्यातील स्थानिक संस्था कराची तूट भरून काढण्यासाठी रक्कम रूपये ४१९.६९ कोटी (रू. चारशे एकोणीस कोटी एकोणसत्तर लाख फक्त.) खालील प्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

## सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील ऑगस्ट २०१५ महिन्याकरीता वाटप करावयाचा महानगरपालिका निहाय्य निधी

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नांव | माहे ऑगस्ट २०१५ मधील वितरीत करावयाचे अनुदान (रक्कम रू. कोटीत) |
|---|---|---|
| १ | मिरा-भाईंदर | १२.२७ |
| २ | जळगाव | ५.७९ |
| ३ | नांदेड-वाघाळा | ३.७० |
| ४ | वसई-विरार | १५.९४ |
| ५ | सोलापूर | १२.३७ |
| ६ | कोल्हापूर | ६.४३ |
| ७ | औरंगाबाद | ११.५७ |
| ८ | अहमदनगर | ५.३८ |
| ९ | उल्हासनगर | १०.११ |
| १० | अमरावती | ७.१४ |
| ११ | कल्याण-डोंबिवली | १०.६६ |
| १२ | चंद्रपूर | ३.४४ |
| १३ | परभणी | १.० |
| १४ | लातूर | ०.९१ |
| १५ | पुणे | ८१.४१ |
| १६ | पिंपरी-चिंचवड | ६६.४८ |
| १७ | नागपूर | ३०.९८ |
| १८ | ठाणे | ३५.७४ |
| १९ | नवी मुंबई | ११.५४ |
| २० | सांगली | ७.७५ |
| २१ | भिवंडी-निजामपूर | १४.६५ |
| २२ | मालेगाव | ८.७३ |
| २३ | नाशिक | ४५.८५ |
| २४ | धुळे | ५.६३ |
| २५ | अकोला | ४.२२ |
| **एकुण** | | **४१९.६९** |

२. उपरोक्त रक्कम रू.४१९.६९ कोटी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर नगर परिषद संचालयानाकडे सूपूर्द करण्यात येत आहे. त्यांनी ही रक्कम कोषागारातून आहरीत करून २५ धनादेशाद्वारे देण्याची व्यवस्था करावी.

३. याकरीता संचालक तथा आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहाय्यक संचालक नगरपरिषद संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याकरीता होणारा खर्च " मागणी क्रमांक : एफ-४, ३६०४०९४२, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २०० , इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा, (००) (०९) महानगरपालिका क्षेत्रातील स्थानिक संस्था कर रद्द केल्यामुळे महानगरपालिकांसाठी तरतूद (३६०४०९४२) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक. ३६८- /व्यय- ३ ,दि. ०३.०८. २०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१५०१४२६०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Lokhande

Digitally signed by Govind Lokhande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ce89373fc7a728d2cdfa1a26c08e1e3f7e3f4f232c1bd146794d3cc3034d5701, cn=Govind Lokhande
Date: 2015.08.04 15:07:23 +05'30'

**( गो. आ. लोखंडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव.

२. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय, वरळी, मुंबई.

३. संबंधित जिल्हाधिकारी.

४. आयुक्त संबंधित महानगरपालिका.

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर).

६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

८. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.

९. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६,मंत्रालय,मुंबई.

१०. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
११. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
१२. कार्यासन अधिकारी नवि-४, मंत्रालय,मुंबई.
१३. निवड नस्ती, नवि-३२.